डिझेल दरवाढीच्या अनुषंगाने जिल्ह्यातील केरोसिनच्या वाहतूक दरामध्ये वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रॉकेल-२०१४ /प्र.क्र.१६१ / ना.पु.२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०१ एप्रिल, २०१७.

**वाचा :-** शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : रॉकेल-१५११/प्र.क्र.३०५/ना.पु.२७, दि. १० जुलै,२०१३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने वेळोवेळी केलेली डिझेल दरवाढ विचारात घेऊन शासनाने संदर्भाधीन दिनांक १० जुलै, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत केरोसिन वाहतूक दरात डिझेल दरवाढीचा खर्च देण्यासंदर्भात विहित केलेल्या सुत्रानुसार सुधारणा / वाढ केलेली आहे. तथापि तद्नंतरही केंद्र शासनाने डिझेल दरात वारंवार वाढ केलेली असल्यामुळे डिझेलच्या वाढीव दरानुसार केरोसिन वाहतूक दरात वाढ देण्याबाबत, तसेच आता बदललेल्या परिस्थितीनुसार डिझेल व्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्चातील वाढीचाही विचार करुन वाहतुक दरात वाढ करण्याबाबत फेडरेशन ऑफ महाराष्ट्र केरोसिन डिलर्स असोसिएशन यांनी शासनास विनंती केलेली आहे. फेडरेशन ऑफ केरोसिन डिलर्स असोशिएशन यांनी केलेल्या विनंतीस अनुसरून दिनांक १०/०२/२०१५ च्या शासन निर्णयान्वये श्री.कृ.ब.इंद्रेकर, उपसंचालक, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीने डिझेल दरवाढीच्या अनुषंगाने जिल्हयातील केरोसिनच्या वाहतूक दरामध्ये वाढ करण्याबाबत तसेच डिझेल व्यतिरक्त इतर अनुषंगिक खर्चातील वाढीचा विचार करुन वाहतूक दरात वाढ करण्याबाबतही शासनास शिफारस केलेली आहे. सदर शिफारशीस अनुसरून डिझेल दरवाढीच्या अनुषंगाने केरोसिनच्या वाहतूक दरात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

**अ) केरोसिन परवानाधारकांना डिझेल व्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्च मंजूर करणे :-**

शासनाने दिनांक २६ सप्टेंबर, २००१ रोजी व तद्नंतर केरोसिनच्या वाहतुक दरात केलेली वाढ ही केवळ डिझेलच्या खर्चात झालेल्या वाढीस अनुसरून केलेली आहे. सबब, आता बदललेल्या परिस्थितीनुसार डिझेल व्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्चातील वाढीचा विचार करुन वाहतुक दरात वाढ करण्याबाबत फेडरेशन ऑफ महाराष्ट्र केरोसिन डिलर्स असोसिएशन यांनी शासनास विनंती केलेली आहे.

२. असोसिएशनच्या सदर विनंतीस अनुसरून प्रस्तावनेत नमुद केलेल्या समितीच्या शिफारशीनुसार घाऊक केरोसिन परवानाधारकांना डिझेल व्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्चातील वाढीस अनुसरून सध्याच्या केरोसिन वाहतूक दराच्या २५ % वाढ स्वतंत्रपणे मंजूर करण्यात येत आहे. त्यानुसार सर्व

जिल्हाधिकारी तसेच नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांनी घाऊक केरोसिन परवानाधारकांना डिझेल व्यतिरिक्त इतर अनुषंगिक बाबींचा खर्च म्हणून संदर्भाधीन दिनांक १० जुलै, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये त्यांच्या जिल्हयात सुधारित करण्यात आलेल्या केरोसिन वाहतूक दराच्या २५ % इतकी वाढ मंजूर करावी. या वाढीनुसार किरकोळ केरोसिन विक्रीदर निश्चित करतांना सदर वाढ ही “**डिझेल व्यतिरिक्त अनुषंगिक बाबींचा खर्च**” या शीर्षकाखाली स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावी. या आदेशाची अंमलबजावणी शासन निर्णयाच्या दिनांकापासून करण्यात यावी.

**ब) केरोसिन वाहतुकीसाठी येणा-या केवळ डिझेलवरील खर्चात झालेली वाढ (Only Diesel Cost Rise) मंजूर करणे :-**

फेडरेशन ऑफ महाराष्ट्र केरोसिन डिलर्स असोसिएशनच्या विनंतीस अनुसरून शासनाने आता केरोसिन वाहतुकीसाठी येणा-या केवळ डिझेलवरील खर्चात झालेली वाढ (Only Diesel Cost Rise) मंजूर करण्याचा निर्णय घेतलेला आहे. अशाप्रकारे केवळ डिझेल दरवाढीमुळे वाहतुक खर्चात वाढ देतांना डिझेल दरवाढीचा खर्च देण्यासंदर्भात शासनाने शासन निर्णय दिनांक २६ सप्टेंबर, २००१ अन्वये विहित केलेल्या सुत्रानुसारच (Escalation Formula) केरोसिन वाहतुकीसाठी दरवाढ खर्च देण्याचे शासनाने ठरविले आहे. सदर सुत्र (Escalation Formula) पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| अ) दिनांक ३१/७/२०१२ रोजी डिझेलचे दर | रुपये प्रति लिटर |
| ब) दिनांक १/४/२०१७ रोजी डिझेलचे दर | रुपये प्रति लिटर |
| क) दिनांक १/४/२०१७ रोजी डिझेलच्या दरात झालेली निव्वळ वाढ (ब-अ) | रुपये प्रति लिटर |
| ड) सुस्थितीतील वाहनांची वाहतूक सरासरी | ३.५ कि.मी.प्रति लिटर |
| इ) सर्वसाधारण टँक लॉरीची क्षमता | १२ कि.ली. |
| फ) वाहतूक खर्चात दयावयाची वाढ<br>(पैसे प्रति कि.मी.प्रति कि.ली.) | (ब-अ) (पैशांमध्ये)<br>-------------- = (पैसे प्रति कि.मी.प्रति कि.ली.)<br>(ड X इ) |

३. सर्व जिल्हाधिकारी व नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांनी त्यांच्या जिल्हयातील दिनांक ३१/७/२०१२ व दिनांक १/४/२०१७ रोजीच्या डिझेल दराच्या माहितीच्या आधारे वरील विहित सुत्रानुसार दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून सुधारीत केरोसिन वाहतुक दराची परिगणना करावी.

**क) डिझेलवरील खर्चाच्या वाढीमुळे वाहतूक दरात वाढ करण्याचे अधिकार प्रदान करण्याबाबत:-**

केंद्र शासनाकडून डिझेल दरांमध्ये वारंवार वाढ / घट होत असते त्यामुळे वाढीव डिझेल दरानुसार वाहतूक दरात बदल करण्याबाबतची निवेदने वारंवार शासनाकडे प्राप्त होतात. या मागणीचा शासन स्तरावरुन विचार करुन त्याबाबतचा निर्णय घेण्यास बराच कालावधी लागतो. त्यामुळे प्रस्तावनेत नमुद केलेल्या समितीच्या शिफारशीनुसार घाऊक केरोसिन परवानाधारकांना केरोसिनची वाहतूक करण्याकरीता डिझेल दरामध्ये वाढ/घट झाल्यानुसार द्यावयाच्या वाहतूक दरात विहित सुत्रानुसार

(Escalation Formula) वाढ करण्याबाबतचे अधिकार जिल्हाधिकारी / नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांना या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात येत आहेत. सर्व जिल्हाधिकारी तसेच नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई **यांनी दरवर्षी दिनांक १ एप्रिल रोजी असलेले डिझेलचे दर विचारात घेऊन त्याचदिवशी** दिनांक २६ सप्टेंबर, २००१ चे विहित सुत्र (Escalation Formula) वापरुन डिझेलच्या दरातील वाढीवर आधारीत केरोसिन वाहतुक दर निश्चित करण्याबाबतची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११७०३३०६००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Patil

Digitally signed by Pradeep Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05334a0514755cf2d85a6ca44c91e73cfa81323e994582a4a27e428d216ef701, cn=Pradeep Patil
Date: 2017.04.03 16:47:50 +05'30'

( प्रदिप पाटील )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. श्री.कृ.ब.इंद्रेकर, उप संचालक, वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६.सर्व उप आयुक्त (पुरवठा)
७.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
८.सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी
९. मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
१०. मा.राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
११.कक्ष अधिकारी (ना.पू.२१ व ना.पू.२३ ), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१२.निवडनस्ती.